**<u>वित्तीय मान्यता-</u>**

**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत ( NMSA) मृद आरोग्य पत्रिका ( SHC ) कार्यक्रम सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी वित्तीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मृदस १४१५/ प्र.क्र. १८८/ १७ अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२

तारीख: ९ ऑक्टोंबर, २०१५

<u>वाचा :-</u>

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य पत्रिका योजनेच्या मार्गदर्शक सुचना

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र. ८५/ अर्थ-३ दि. १७ एप्रिल, २०१५

३) कृषि आयुक्तलयाचे क्र. डीडीएसएसएसटी/ इनपुट / क्युसी /एनएमएसए/ एसएचएम /२६३/२०१५ दिनांक १८ एप्रिल २०१५ चे पत्र.

४) केंद्र शासनाचे पत्र क्र .१४-१/२०१५/Fert Use ( Pt ) दि.२८ एप्रिल २०१५ चे पत्र

५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र. १११/ अर्थ-३ दि. ३० जून , २०१५

६) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र. ३४ / कोषा.प्रशा.५ दि. २४ जुलै, २०१५

७) केंद्र शासनाचे पत्र क्र .१६-२/२०१५/, फर्ट युज दि .१८ ऑगस्ट २०१५ ची पत्रे ( तीन )

८) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.मृदस १४१५/प्र.क्र. १८८/१७ अे, दि. ३ ऑक्टोंबर, २०१५

<u>प्रस्तावना :-</u>

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत मृद आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम केंद्र शासनाने सन २०१४-१५ पासून सुरू केलेला आहे. यामध्ये राज्यातील सर्व गावांची टप्प्याने टप्प्याने निवड करून तीन वर्षात राज्यातील सर्व शेतक-यांना जमिन आरोग्य पत्रिकेचे वितरण करण्यात येणार आहे. जमिन आरोग्य पत्रिकेच्या माध्यमातून त्यांच्या जमिनीचा रासायनिक गुणधर्म स्थिती,प्रमुख अन्नद्रव्यांची पातळी व सूक्ष्म मुलद्रव्ये कमतरता स्थितीची माहिती शेतक-यांना देण्यात येणार आहे.

सन २०१४-१५ मध्ये केंद्र व राज्य हिस्स्यांचे प्रमाण ७५ : २५ असे होते. केंद्र शासनाने सन २०१५-१६ मध्ये सदर कार्यकमासाठी केंद्र व राज्य हिस्स्याचे प्रमाण ५०: ५० राहिल असे कळविलेले आहे व त्यानुसार संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये सन २०१५-१६ मध्ये जमिन आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम राज्यात

राबविण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी रू. ९३१.७८ लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रु. ९३१.७८ लक्ष अशा एकुण रू. १८६३.५६ लाख निधीच्या कार्यक्रमास मान्यता कळविलेली आहे. त्यानुसार प्रस्तुत योजना राबविण्यासाठी संदर्भ क्र. ८ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र. ७ येथील पत्रान्वये केंद्र हिस्स्यापोटी सर्वसाधारण प्रवर्गासाठी रू. ५३१.११ लाख, अनुसुचित जातीसाठी रू. १११.८१ व अनुसुचित जमातीसाठी ५५.९१ लाख असा एकुण रू. ६९८.८३ लाख एवढा निधी पहिल्या हप्त्यापोटी वितरीत केलेला आहे. वित्त विभागाने संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्ववये अर्थसंकल्पित निधी एकुण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्के एवढी तरतुद वितरीत करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास दिलेले आहेत. सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पात मृद आरोग्य व्यवस्थापन व मृद आरोग्य पत्रिका करीता केंद्र हिस्यासाठी रू. ५००.०० लाख निधीची तरतूद करण्यात आलेली आहे. वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारानुसार मृद आरोग्य पत्रिका कार्यक्रमाकरिता अर्थसंकल्पित तरतुदीच्या ७० टक्के रक्कम म्हणजे रू.३५०.०० लाख एवढी रक्कम वितरीत करण्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत ( NMSA) जमिन आरोग्य पत्रिका वितरण कार्यक्रम सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाकडून पहिल्या हप्त्यापोटी प्राप्त झालेला निधी रू. ६९८.८३ लाख ( रू. सहा कोटी अठ्यान्नव लाख त्र्याऐंशी हजार फक्त) पैकी रू. ३५०.०० लाख ( तीन कोटी पन्नास लाख फक्त ) एवढी रक्कम खर्च करण्यास शासन वित्तीय मान्यता देत आहे.

२. सदर कार्यक्रमातंर्गत रु.३५०.०० लाख निधीचा घटकनिहाय भौतिक व आर्थिक लक्ष्य पुढीलप्रमाणे राहील.

**(रुपये लाखात)**

| **अ.क्र.** | **घटक** | **भौतीक** | **दर (रुपये)** | **केंद्र हिस्सा वितरीत निधी** |
|---|---|---|---|---|
| | मृद आरोग्य पत्रिका | | | |
| १ | मृद नमुने विश्लेषण | १६७०५२ | १९० प्रती नमुना | ३१७.४० |
| २ | मृद विश्लेषकांचे प्रशिक्षण | ०८ | ६०००० प्रती प्रशिक्षण | ४.८० |
| ३ | शेतकऱ्यांचे प्रशिक्षण | ३४ | २४००० प्रती प्रशिक्षण | ८.१६ |
| ५ | कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण | ३४ | ३६००० प्रती प्रशिक्षण | १२.२४ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६ | आयसीटी | ---- | lumpsum | २.४३ |
| ७ | कार्यशाळा | ०१ | १५०००० | १.५० |
| ८ | अभियान व्यवस्थापन | --- | lumpsum | ३.४७ |
| **एकुण** | | | | **३५०.००** |
| **सर्वसाधारण प्रवर्ग (७६%)** | | | | **२.६६** |
| **अनुसूचित जाती प्रवर्ग (१६%)** | | | | **०.५६** |
| **अनुसूचित जमात प्रवर्ग (८%)** | | | | **०.२८** |

३. या प्रित्यर्थ होणार खर्च सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. डी-३**

**२४०२, मृद व जलसंधारण.**

**( १०१) मृद सर्वेक्षण व चाचणी**

**( ००) (१३) मृद आरोग्य व्यवस्थापन आणि जमिनीची उत्पादन क्षमता**

**( २४०२ १०४६) केंद्र पुरस्कृत**

**३३ - अर्थसहाय्य.**

४. सदरचा निधी वितरीत करणेबाबत वित्त विभागाच्या उपरोक्त अनुक्रमांक २ येथील परिपत्रकामधील ७ ते १८ मधिल अटींची पूर्तता करण्यात आली आहे. तसेच या परिपत्रकातील तपासणी सूचीतील सर्व अटींची देखील पूर्तता करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या उपरोक्त अनुक्रमांक क्र.६ येथील परिपत्रकातील **(अ)** मधील प्रशासकीय विभागांनी निधी वितरीत करताना घ्यावयाची दक्षता याबाबत मुद्यांची माहिती खालीलप्रमाणे आहे :-

| **अ.क्र.** | **बाब** | **स्पष्टीकरण** |
|---|---|---|
| १ | विभागास प्रदान वित्तीय अधिकार | शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५ अन्वये प्रदान करण्यात आलेले आहे. |
| २ | मंजूर निधी | रु.५००.०० लक्ष |

| | | |
|---|---|---|
| ३ | मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५ टक्के किंवा अधिक निधी खर्च झाला आहे. | लागू नाही. |
| ४ | ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही | प्रलंबित नाही. |
| ५ | स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचे कडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे. | लागू नाही. |
| ६ | वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे. | लागू नाही. |
| ७ | बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकिय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा. | लागू नाही. |
| ८ | अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रितसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत. | लागू नाही. |
| ९ | खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा. | लागू नाही. |
| १० | साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी. | लागू नाही. |

**५. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे**.

**१.** सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या पत्रात नमुद केलेल्या अटी व शर्तीनुसार राबविण्यात यावी.

**२.** खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण केलेला अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावा.त्याप्रमाणे अनुसूचित जाती / जमाती / महिला लाभार्थ्यासाठी खर्चाचे लेखे वरील प्रमाणे ठेवण्याची जबाबदारी अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेची राहील.

३. योजनेच्या वेगवेगळ्या बाबीवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा. तसेच सदरचा अहवाल राज्य शासनाकडेसुध्दा पाठविण्यात यावा.

४. योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमाखर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे जेणेकरून पारदर्शी स्वरूपात सदर रकमा विचारात घेता येतील व संदीग्धता राहणार नाही.

५. केंद्र शासनाने कळविल्याप्रमाणे अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या लाभार्थी शेतकऱ्यांसाठी अनुक्रमे १६ % व ८ % एवढा निधी खर्च करण्यात यावा.केंद्र शासनाने कळविल्याप्रमाणे महिला शेतकरी लाभार्थ्यासाठी निधी खर्च करण्यात यावा.

६. मृद आरोग्य पत्रिका वितरीत केलेल्या शेतकरी लाभार्थ्यांची यादी ग्रामपंचायत / तालुका कार्यालये/ पंचायत समिती /जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी. तसेच यादी कृषि विभागाच्या संकेतस्थळावर देखील अपलोड करण्यात यावी

७. कोणत्याही परिस्थितीत मंजुर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही, या बाबत कृषि संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ) कृषि आयुक्तालय, पुणे. यांनी आवश्यक ती दक्षता घ्यावी.

८. कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य-पुणे हे योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणुन काम पाहतील व सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिका-यांना मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

९. सदर आदेश हे शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थस -२०१५/प्र.क्र. ८५ /अर्थ -३ दि. १७ एप्रिल, २०१५ व क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र. १११/अर्थ - ३ , दि. ३० जून, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारामध्ये व अपर मुख्य सचिव ( कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००९१७२६१९७५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Akusing Narshi Vasave
Date: 2015.10.09 17:28:15 +05'30'

**( आ.न.वसावे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

२) संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे

३) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर

४) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे

५) सर्व विभागीय कृषि सहसंचालक

६) मा. मंत्री (कृषि) / मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव

७) अपर मुख्य सचिव (कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक (कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

८) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१०) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई

११) नियोजन विभाग-१४३१

१२) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) निवडनस्ती.